**समाज प्रबोधन पत्रिका जुलै-ऑगस्ट १९७१**

***पुस्तक : राइझ ऑफ मुस्लिम्स इन इंडियन पॉलिटिक्स***

***रफीक झकेरिया***

***सौमैया पब्लिकेशन्स, मुंबई, १९७०***

***रु. ४५.००***

## राजकारणी झकेरियाकृत सावध चिकित्सा

भारतीय राष्ट्रसभेच्या स्थापनेच्या वेळेपासूनच मुस्लिम पुढाऱ्यांचा तिला विरोध होता. पण राजकारणी उद्दिष्टे समोर ठेवून मुस्लिम लीगची स्थापना व्हायला आणखी २१ वर्षे जावी लागली. १८८५ ते १९०६ या २१ वर्षांच्या काळात फुटीर मुस्लिम जातीयवादी राजकारणाने आकार घेतला. त्याचा आलेख रफिक झकेरिया यांनी आपल्या 'राइझ ऑफ मुस्लिम्स इन इंडियन पॉलिटिक्स' या ग्रंथात काढला आहे. पीएच.डी. या पदवीसाठी लंडन विद्यापीठास सादर केलेल्या प्रबंधावर हे पुस्तक आधारलेले आहे. या प्रबंधाचे लेखन १९४४-४८ या काळात झाले. डॉक्टरेट मिळाल्यापासून २२ वर्षे या ग्रंथास प्रसिद्धीचा उजेड दिसू शकला नाही! श्री झकेरिया यांचे राजकीय स्थान लक्षात घेता, त्यांनी इच्छा केली असती तर या पुस्तकाचे प्रकाशन दहा-पंधरा वर्षांपूर्वी तरी सहजच होऊ शकले असते. १९७० पर्यंत आपला प्रबंध प्रसिद्ध करण्यास पुरेसा आत्मविश्वास त्यांना वाटला नाही ही गोष्ट अनेक गोष्टींवर प्रकाश टाकणारी आहे. इतक्या उशीरा तो प्रसिद्ध करण्यामुळे एका अर्थी त्यांना काही गमवावेही लागले आहे. त्यांनी उजेडात आणलेली माहिती १९४८ साली नवी होती, १९७० मध्ये ती शिळी झालेली आहे. राजकारणी सावधपणासाठी झकेरियासाहेबांना द्यावी लागलेली ती किंमत आहे.

पाकिस्तानच्या निर्मितीचे बीज सर सय्यद अहमद यांच्या भूमिकेतच दडलेले होते, काँग्रेसच्या स्थापनेपासूनच मुस्लिम समाज, विशेषतः त्याच्यातील शिक्षित व पुरोगामी वळणाचा गट, काँग्रेसला कट्टर विरोध करीत राहिला व सर्व प्रयत्न करूनही काँग्रेसमध्ये मुसलमानांना खेचून आणण्यात कधीच यश आले नाही, या गोष्टी आज अभ्यासकांना ज्ञात आहेत. आम्ही एकेकाळी येथे राज्य केलेले आहे आणि म्हणून आम्ही संख्येने अल्प असलो तरी पन्नास टक्के भागीदारी मिळत असेल तरच आम्ही हिंदूंबरोबर एका देशात एकत्र राहू शकतो अशी भूमिका अगदी त्यावेळपासून (१८८५) मांडली गेलेली आढळते. लोकनियुक्त प्रातिनिधिक राज्यपद्धती स्वीकारल्यास आपणास कायम दुय्यम स्थान पत्करावे लागणार आणि ते कसे शक्य आहे, असा प्रश्न त्याच वेळी विचारला गेलेला आढळतो. १९४० नंतरचे मुस्लिम लीगी राजकारण आणि सर सय्यद यांचे राजकारण यांच्यात एक फरक सांगता येतो. या विषम परिस्थितीत दोन जमातींमध्ये समतोल साधण्यासाठी ब्रिटिशांसारख्या सुसंस्कृत, समानधर्मी लोकांचे राज्य हिंदुस्थानवर कायमचे राहिले पाहिजे हा सर सय्यद यांचा तोडगा होता; तर, आपण प्रतिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीच्या दिशेने होणारी वाटचाल थांबवू

शकत नाही याचे भान आल्यावर, बहुसंख्येच्या जोरावर जेथे मुसलमान कायमचे सत्ताधीश राहतील असे एक वेगळे राष्ट्र आपणास मिळावे हा जिनांचा १९४० नंतरचा तोडगा होता.

सर सय्यद अहमद यांच्या भूमिकेची तार्किक परिणती हिंदुस्थानची फाळणी हीच होती असे म्हणता येते. पण सर सय्यद अहमद यांची भूमिकाच मुसलमान समाजात प्रभावी ठरावी हे अपरिहार्य नव्हते. किंबहुना मुस्लिम लीगची स्थापना हा सर सय्यद अहमद यांच्या भूमिकेचा पराभव होता. ब्रिटिश सत्तेविरुद्ध राजकारण करणे आत्मघातकी होय, हिंदूंसारखा तो गुन्हा आपण करता कामा नये याविषयी त्यांचा अतिरेकी आग्रह होता; पण इंग्रजी शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या नव्या पिढीला, आज ना उद्या लोकनियुक्त प्रातिनिधिक राज्यसत्ता येणार ही गोष्ट स्पष्ट दिसत होती व त्यांना इंग्रजांचे राज्य हे ईश्वरी वरदान आहे असे वाटेनासे झालेले होते. एका अर्थी, उपरोधाची मोठी गोष्ट अशी की, महंमदअली जिना हे या नव्या मुसलमानांच्या पिढीचे त्या वेळी प्रतिनिधित्व करीत होते. कलकत्त्याच्या २२व्या काँग्रेस अधिवेशनात त्यांनी 'मागास जमतीं'ना विधिमंडळात जागा राखून ठेवण्याच्या सूचनेस विरोध केला. ते म्हणाले, "मुसलमान जमातीला हिंदूंपेक्षा कोणत्याही दृष्टीने वेगळी विशेष वागणूक दिली जाऊ नये या मुद्याकडे मला लक्ष वेधायचे आहे. आपण सर्व समान आहोत या तत्त्वावर भारतीय राष्ट्रसभेची उभारणी झालेली आहे. कोणत्याही वर्गासाठी वा जमातीसाठी जागा राखून ठेवण्याची गोष्ट त्यात बसत नाही." (पृ. १०३)

काँग्रेसला या शिक्षित, पांढरपेशा, प्रागतिक मुसलमानांना आपल्याकडे का खेचून घेता आले नाही हा खरा निर्णायक प्रश्न आहे. फुटीर जातीयवादी राजकारण करणाऱ्यांची भूमिका स्वच्छ होती. तेव्हा, एकराष्ट्रवादी राजकारणी मंडळींचा फुटीर राजकारण मोडून काढण्याचा प्रयत्न होता त्यात त्यांना यश का आले नाही, याच प्रश्नाला आपणास उत्तर शोधले पाहिजे. वर उद्धृत केलेले उद्गार काढणारेच जिना पाकिस्तानचे राजकारण खेळण्यास का प्रवृत्त झाले? अशीही त्याची मांडणी करता येईल.

झकेरियासाहेबांच्या प्रबंधाचा कालखंड आहे १८८५ ते १९०६. या प्रश्नाचे उत्तर शोधायचे तर त्यांना १९०६ नंतरच्या घटनांचाही विचार करावा लागला असता हे खरे. पण १९०६ पर्यंतच्याच कालखंडास स्वतःस बांधून घेऊनही त्यांना फुटीर राजकारण प्रभावी करणारे सामाजिक प्रवाह स्पष्ट करता येणे शक्य होते. ती गोष्ट त्यांनी त्यांच्या मूळ प्रबंधात केली नाही याबद्दल अर्थातच तक्रार नाही. अखेरीस एक पदवी पदरात पाडून घेण्याच्या विशिष्ट उद्दिष्टाने तो प्रयत्न मर्यादित होणे अटळ होते. पण १९७० सालीही त्यांनी या प्रश्नाला बगल द्यावी ही गोष्ट खटकते.

अशा खटकण्यासारख्या गोष्टी या पुस्तकात बऱ्याच आहेत. या कालखंडाबद्दल लिहिणाऱ्या कोणालाही आज काही मुद्यांविषयी निःसंदिग्ध भूमिका घेणे आवश्यक आहे. हिंदी सुशिक्षित पांढरपेशा वर्ग संघटित होऊन राजकीय मागण्या करू लागल्यावर त्याच्या विरोधी अशा शक्ती संघटित व्हाव्यात असा प्रयत्न भारतातील ब्रिटिश प्रशासकांनी पद्धतशीरपणे केला व त्यास ब्रिटिश मंत्रिमंडळ, भारतमंत्री, व्हाइसरॉय - गव्हर्नर यांचाही (काही सन्माननीय अपवाद वगळता) पाठिंबा राहिला ही गोष्ट निर्विवादपणे शाबीत झाली आहे. या पार्श्वभूमीवर, मुस्लिम पुढाऱ्यांनी फुटीर

राजकारणाचा मार्ग स्वीकारण्यात ब्रिटिश प्रशासक - राज्यकर्ते यांचा हातभार किती होता याविषयी मत देणे आवश्यक ठरते. १८५७ नंतरच्या काळात मुसलमान समाजाची परिस्थिती दिवसेंदिवस खालावत चालली आहे, सर्वत्र हिंदू आपली पकड जमवीत आहेत आणि ब्रिटिश राजवटीने मुसलमानांना न्याय दिला पाहिजे; तसा न्याय द्यायचा असेल तर कौन्सिलमध्ये लोकनियुक्त प्रतिनिधींची संख्या वाढवावी व त्यांच्या हाती अधिक सत्ता द्यावी, नोकऱ्या शैक्षणिक पात्रतेनुसार दिल्या जाव्यात, आय.सी.एस.ची परीक्षा भारतात घ्यावी, इत्यादि मागण्या मान्य करता कामा नयेत; खानदान, ऐतिहासिक महत्त्व, इ. गोष्टींना प्राधान्य द्यावे, अशी सर सय्यद अहमद व अन्य मुस्लिम पुढाऱ्यांची भूमिका होती. हे त्यांचे गाऱ्हाणे हिंदुस्थानात सर्वत्र सारख्या प्रमाणात खरे होते का याची प्रथम तपासणी करण्याची गरज आहे. चालू परिस्थितीला हिंदू किती जबाबदार होते व मुस्लिम उच्चवर्गीयांचा दिवाळखोरपणा व वावदूकता किती कारणीभूत होती याविषयीचा निवाडा अभ्यासकाने करणे आवश्यक ठरते. सर सय्यद अहमदांचे राजकारण प्रभावी ठरले ही ऐतिहासिक घटना आहे. पण म्हणून ते प्रभावी ठरण्याचा तपशील सांगण्याने अभ्यासकाची जबाबदारी संपत नाही. त्या राजकारणामागचे हितसंबंधी गट कोणते होते, त्यांच्या मर्यादा कोणत्या होत्या, ते प्रभावी का ठरले या गोष्टी स्पष्ट करणे आवश्यक असते. उर्दूऐवजी हिंदीला अधिकृत सरकारी कामकाजाची भाषा म्हणून मान्यता द्यावी, गोहत्या सार्वजनिकरीत्या केली जाऊ नये, इत्यादि मागण्या या हिंदू-मुसलमानांतील तेढ वाढविण्यास, दंगलीस कारणीभूत झाल्या हे खरे. पण मुसलमानी अमलाखाली दीर्घकाळ दडपल्या गेलेल्या उत्तर भारतीय हिंदू जनतेची, मुसलमानी राजवटीचे जोखड दूर झाल्यावर आता आपणास रास्त स्थान मिळावे ही आकांक्षा त्यातून व्यक्त होत होती. या मुद्यावर निःसंदिग्धपणे चूक पदरात घातली जावी अशी अपेक्षा असते.

पण झकेरियासाहेब अशा निःसंदिग्ध भूमिका घेत नाहीत; आपली मूठ झाकलेलीच ठेवतात. प्रबंधाचे प्रथम लेखन ज्या काळात झाले तो पाकिस्तानच्या ऐन निर्मितीचा काळ होता. तेव्हा अद्यापही ब्रिटिश राजवट होती. ठाम भूमिका घेऊन अशा अवघड प्रश्नांना सरळ सरळ उत्तरे देणे झकेरियांना तेव्हा जमले नसले तर ते समजू शकते. अखेरीस त्या वेळी ते एक तरुण पीएच.डी. इच्छुक विद्यार्थी होते. पण आपण बुद्धिवादी अभ्यासक असल्याचा दावा त्यांना करायचा असेल तर, आज या मुद्यावरून स्पष्ट विवेचन करण्याची जबाबदारी त्यांना टाळता येत नाही.

सर सय्यद यांचे मन मध्ययुगीन सरंजामदारी होते ही गोष्ट झकेरियांनी स्पष्ट केली आहे. त्यामुळे त्यांचे राजकारणही अपरिहार्यपणे मुस्लिम बहुजन समाजाच्या दृष्टीनेही प्रतिगामी व अहितकारक आशयाचे होते हा त्यातून निघणारा तर्कशुद्ध निष्कर्ष मात्र ते काढत नाहीत. इंग्रज व इंग्लिश संस्कृती यांच्याशी आपण जुळवून घ्यावे या भूमिकेपायी उलेमांचा रोष त्यांनी ओढवून घेतला. पण अलिगढच्या कॉलेजला मुस्लिम उच्चवर्गीयांचा पाठिंबा मिळावा या दृष्टीने त्यांनी अलिगढ कॉलेजमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मनावर अंधधर्मनिष्ठेचे संस्कार करण्याची तडजोड स्वीकारली आणि त्यामुळे अलिगढ हे इस्लामच्या सुधारणेचे केंद्र कधीच बनू शकले नाही. यात जो बौद्धिक अप्रामाणिकपणा आहे त्यावर झकेरियासाहेबांनी बोट ठेवलेले नाही. थोडक्यात, सर सय्यद अहमद व त्यांचे राजकारण याविषयी अतिशय गोलमोल अशी भूमिका झकेरियासाहेबांनी घेतलेली आहे. किंबहुना, सर सय्यद अहमद हे एक थोर नेतेच होत, मुस्लिम

पुनरुत्थानाचे ते मुख्य प्रवर्तक होत अशीच त्यांची एकंदर भूमिका दिसते. पाकिस्तानची निर्मिती हे ज्यांना यशस्वी कर्तबगारीचे परमोच्च शिखर वाटते अशा मुसलमानांचे सर सय्यद यांच्याविषयीचे मूल्यांकन असे असावे हे जितके स्वाभाविक तितकेच ज्यांना ती एक चूक वाटते ( ती घडण्यात कोणाचा किती वाटा तो प्रश्न वेगळा), यांचे मूल्यांकन सर्वस्वी वेगळे राहील ही गोष्टही उघड आहे.

'पॉलिटिक्स इज द आर्ट ऑफ द पॉसिबल' अशी एक उक्ती आहे. झकेरियासाहेबांनी तिचे मर्म पूर्ण जाणले असावे असे प्रस्तुत पुस्तक वाचताना सतत वाटत राहते. प्रागतिक मुस्लिम पुढाऱ्याची प्रतिमा स्वतःभोवती निर्माण करून ठेवणे किती आवश्यक आहे याची त्यांना कल्पना आहे. त्या दृष्टीने, हमीद दलवाई व इतरांनी मुस्लिम राजकारणाची परखड चिकित्सा करून निर्माण केलेल्या पार्श्वभूमीवर, आपला ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा फायदा त्यांना लक्षात आला असणार. पण खुल्लमखुल्ला चिकित्सा केल्याने आपण हिंदू व मुसलमान दोघांच्याही मनात अप्रिय ठरू याचीही जाण त्यांना असावी. कारण पाकिस्तान निर्मितीला कारणीभूत झालेल्या विविध शक्तिप्रवाहांची वास्तव चिकित्सा हिंदू व मुसलमान, दोघांनीही उराशी बाळगलेल्या भ्रमांना - मिथ्सना - धक्का देईल ही शक्यता खूप. कोणाचेच ठाम मूल्यमापन करण्याचा धोका न पत्करता, संदिग्धता राखून आपला पीएच.डी. प्रबंध प्रसिद्ध करणे हे राजकारणाच्या दृष्टीने " पॉसिबल" आहे या निर्णयावर झकेरियासाहेब आले असले तर नवल नाही.

एक महत्त्वाकांक्षी मुस्लिम राजकारणी पुढारी, संदिग्ध स्वरुपात का होईना पण, फुटीर मुस्लिम राजकारणाचा उगम हिंदूंच्या जातीय राजकारणात नसून ब्रिटिश, व खानदानी सरंजामदार मुस्लिम पुढारी यांच्या लोकशाही व स्वातंत्र्यविरोधी युतीमध्ये आढळतो असे सूचित करण्याचे धाडस करतो, व धाडस करणे आपल्या राजकीय करिअरला पोषक आहे असे मानतो ही गोष्ट महत्त्वाची आहे. पाकिस्तानच्या निर्मितीची वास्तव चिकित्सा करण्याइतकी हिंदू व मुसलमान समाजातील शिक्षित, पांढरपेशा मंडळींची प्रगती झाल्याखेरीज मनातील पूर्वग्रहांची जळमटे, परस्परांविषयीचे आकस दूर होणार नाहीत व मने अशा चिकित्सेतून साफ झाल्याखेरीज दिलजमाई होऊन एकात्म भारताच्या निर्मितीचा मार्ग खुला होणार नाही, असे प्रस्तुत समीक्षकाचे मत आहे. अशा चिकित्सेच्या दिशेने आपण किती पुढे आलो आहोत त्याचे झकेरियांचे पुस्तक निदर्शक आहे. कारण झकेरिया हे सामान्य, स्वार्थप्रेरित, शिक्षित, पांढरपेशा व्यक्तीचे प्रतिनिधित्व अधिक सम्यकरीत्या करतात, तसे दलवाई वा कुरुंदकर वा करंदीकर करू शकत नाहीत. झकेरियासाहेब हे या अर्थाने वातकुक्कुट म्हणता येतील.